**सहकारी सूत गिरण्या :**
**सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजना राबविण्यासाठी आवश्यक असणारी अस्थायी कर्मचाऱ्यांची पदे सन २०१८-१९ साठी पुढे चालू ठेवण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः: अपदे २७१७/प्र.क्र.१४/टेक्स १ (अ)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख : ०६ ऑक्टोबर, २०१८

वाचा :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. राजस १००५/प्र.क्र.१८१/५-स, दिनांक ३१ जानेवारी, २००६
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ५ मे, २०११
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.अपदे २७१७/प्र.क्र.१४/टेक्स १(अ), दिनांक ३१ मार्च, २०१८
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र जा.क्र. आस्थापना/कक्ष-४/सुतगिरणी/मुदतवाढ/१०५६/२०१८, दिनांक ०१ सप्टेंबर, २०१८
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र., दि.०७ सप्टेंबर, २०१८

प्रस्तावना :-

संदर्भ क्र. ३) येथील दिनांक ३१ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये सहकारी सूत गिरण्यांकरीता सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजना राबविण्यासाठी आवश्यक असणारी २३ अस्थायी पदे दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली होती. सदर योजनेतील २३ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१८ पासून दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. २) येथील दिनांक ५ मे, २०११ च्या शासन निर्णयान्वये या विभागातील स्थायी व अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार ९३१९ पदांच्या सुधारीत आकृताबंधास मंजूरी देण्यात आली आहे. त्यामध्ये सतत व समवर्ती लेखापरीक्षण योजने अंतर्गत खाली दर्शविण्यात आलेल्या २३ अस्थायी पदांचा

समावेश असल्याने सदर २३ अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१८ पासून दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

| क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-१ | रु. १५६०० - ३९१०० ग्रेड पे ५४०० | ४ |
| २ | लेखापरिक्षक, श्रेणी-२ | रु. ९३०० - ३४८०० ग्रेड पे ४२०० | ६ |
| ३ | उपलेखापरिक्षक | रु. ५२०० - २०२०० ग्रेड पे २४०० | ४ |
| ४ | कनिष्ठ लिपीक | रु. ५२०० - २०२०० ग्रेड पे १९०० | ६ |
| ५ | शिपाई | रु. ४४४० - ७४४० ग्रेड पे १३०० | ३ |
| | **एकूण पदे** | | **२३** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. व्ही-२ : २४२५-सहकार - १०१, सहकारी संस्थांची लेखापरीक्षा - (०१)(०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७ सप्टेंबर, २०१८ अन्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१७३२३३१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2018.10.06 17:34:49 +05'30'

(प्रमोद द. तुपे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुबई / महाराष्ट्र १, नागपूर
२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १, मुबई / महाराष्ट्र १ नागपूर
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
४. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, कार्यासन ५-स, १२-स, १७-स, टेक्स-२, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

५. अवर सचिव/ कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-२, अर्थसंकल्प-१९, वित्तीय सुधारणा-१/ आ.पु.क., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

७. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर

८. सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण), पुणे

९. विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था (सूतगिरण्या), सांगली / अमरावती / सोलापूर / इचलकरंजी

१०. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सांगली / कोल्हापूर / सोलापूर / अमरावती

११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली / कोल्हापूर / सोलापूर / अमरावती

१३. निवडनस्ती टेक्स १ (अ) / टेक्स १ (ब).